**मिहान व अन्य विशेष आर्थिक क्षेत्राच्या विकासकांना/ घटकांना त्यांच्या क्षेत्रातील भूखंडाचा विकास व बांधकामादरम्यान उत्खनन होणाऱ्या व वापरल्या जाणाऱ्या गौण खनिजावरील स्वामित्वधन आकारणीतून सुट देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गौखनि -१०/०२१२/प्र.क्र. ७८/ख,**
३२ वा मजला, सेंन्टर-१, जागतीक व्यापार केन्द्र
कफ परेड, मुंबई ४०० ००५,
तारीख: २७.११.२०१४

**वाचा**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः गौखनि-१०८८/४३३/३५९२/ख, दिनांक १८/१०/२००१
२) शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक - एसीझेड-२०१०/सीआर-५३४/उद्योग-२, दिनांक १५/१०/२०११

**प्रस्तावना**

केंद्र शासनाने अधिसूचित केलेल्या मिहान व अन्य विशेष आर्थिक क्षेत्राच्या विकासकांना / घटकांना आर्थिक सवलती देण्यासाठी महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ च्या कलम ४८ अनुसार व संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये आकारण्यात येणाऱ्या गौण खनिजावरील स्वामित्वधन आकारणीपासून सुट देण्यात यावी, या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यानुसार उद्योग, उर्जा व कामगार विभागाने केंद्र शासनाने अधिसूचित केलेल्या मिहान व अन्य विशेष आर्थिक क्षेत्राच्या विकासकांना / घटकांना आर्थिक सवलती देण्यासाठी त्यांच्या क्षेत्रातील भूखंडाचा विकास व बांधकामादरम्यान उत्खनन होणाऱ्या व वापरल्या जाणाऱ्या गौण खनिजावरील स्वामित्वधन आकारणीतून सुट देण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक २ येथिल शासन निर्णय निर्गमित केला आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ५ मधील तरतुदीनुसार गौण खनिजावरील स्वामित्वधन आकारणीतून सूट देण्याकरीता संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u>

प्रस्तावनेत नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णय क्रमांक : गौखनि-१०८८/४३३/३५९२/ख, दि.१८ ऑक्टोबर, २००१ मध्ये खालीलप्रमाणे अंशत: सुधारणा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

१) केंद्र शासनाने अधिसूचित केलेल्या मिहान व अन्य विशेष आर्थिक क्षेत्राच्या विकासकांना / घटकांना आर्थिक सवलती देण्यासाठी त्यांच्या क्षेत्रातील भूखंडाचा विकास व बांधकामादरम्यान उत्खनन होणाऱ्या व वापरल्या जाणाऱ्या गौण खनिजावरील स्वामित्वधन आकारणीतून सूट देण्यात यावी. ही सवलत पुढील २५ वर्षाकरीता किंवा प्रस्तावित महाराष्ट्र विशेष आर्थिक क्षेत्र व नेमून दिलेले क्षेत्र अधिनियम, २०१० हे विधेयक पारित होईल यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीकरीता लागू राहील.

२) सदर भूखंडावरील खोदकामापासून उत्खनन केलेले गौण खनिज त्या क्षेत्राव्यतिरिक्त इतर ठिकाणी वापरल्यास किंवा त्याची विक्री केल्यास नियमानुसार स्वामित्वधन देय राहील.

३) अशा उत्खनन केलेल्या तथापि बांधकामाकरिता अथवा इतर विकास कामाकरिता वापरात न आणलेल्या गौण खनिजाची लिलावाव्दारे अथवा परवान्याद्वारे विल्हेवाट लावण्याचे अधिकार क्षेत्रिय महसूल अधिकाऱ्यांना राहतील.

४) यापूर्वी उत्खनन केलेल्या व या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत ज्या प्रकरणात संबधितांविरुध्द नोटीस देवून दंडात्मक कारवाई सुरु करण्यात आली आहे. तथापि, अद्यापि दंडात्मक रकमेची वसूली करण्यात आली नाही, अशा प्रकरणातही सदर आदेश लागू राहतील.

५) उद्योजकांना त्या क्षेत्रात उत्खनन केलेल्या गौण खनिजाची विक्री / वाणिज्यिक वापर करता येणार नाही.

६) गौण खनिजाचा गैरवापर होणार नाही याबाबत जिल्हाधिकारी कार्यालयाने योग्य ती दक्षता घ्यावी.

७) भूखंडावरील गौण खनिजाचे उत्खनन करण्यासाठी तसेच उत्खनन केलेल्या गौण खनिजाचा वापर करण्यासाठी जिल्हाधिकारी यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. परवानगी अर्ज प्राप्त झाल्यापासून १५ दिवसात अर्जावर जिल्हाधिकारी यांनी निर्णय घेणे आवश्यक राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२६१२३१०८३२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manik Abaji Gutte

Digitally signed by Manik Abaji Gutte
DN: CN = Manik Abaji Gutte, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.11.27 13:32:40 +05'30'

**मा. आ. गुट्टे**
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व जिल्हाधिकारी.
३. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, इंडियन मर्कन्टाईल चेम्बर्स, मुंबई-३८.
७. सर्व मंत्रालयीन विभाग.
८. महालेखापाल-१ / २, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
९. महालेखापाल-१ / २, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. वित्त विभाग, व्यय-९, मंत्रालय, मुंबई.
१२. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई..